**राज्यातील इतर मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्ग या प्रवर्गातील पदवी अभ्यासक्रमात प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी वसतीगृह सुरु करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक: वगृयो-२०२०/प्र.क्र.०१/योजना-५**
मोती महल,२ रा मजला १९५,जे.टाटा रोड,
चर्चगेट, मुंबई ४०० ०२०
दिनांक :- २९ फेब्रुवारी, २०२४

**संदर्भ**:-१) शासन निर्णय क्रमांक- वगृयो-२०२०/प्र.क्र.०१/योजना-५, दि. १९ डिसेंबर, २०२३

**शासन शुध्दीपत्रक:-**

उपरोक्त संदर्भ क्र. १ अन्वये राज्यातील इतर मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्ग या प्रवर्गातील पदवी अभ्यासक्रमात प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी वसतीगृह सुरु करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

उपरोक्त शासन निर्णयातील वसतीगृहात प्रवेश देण्याकरीता नियम व अट क्र. २ व ३ मध्ये खालील प्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

अ) **नियम व अट क्र.०२** - "सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेला इतर मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागासप्रवर्गाचा जातीचा दाखला तसेच इतर मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गाचे वैध जात पडताळणी प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक असेल."

**याऐवजी**

"इतर मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेले जात प्रमाणपत्र बंधनकारक असेल. तथापि, ज्या अभ्यासक्रमाकरीता जात प्रमाणपत्र बरोबर जात वैधता प्रमाणपत्र बंधनकारक आहे, त्या अभ्यासक्रमाकरीता प्रवेश घेतलेल्या इतर मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना जात वैधता प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक असेल", असे वाचावे.

ब) **नियम व अट क्र. ०३** § "अनाथ, दिव्यांग व आर्थिक मागास घटक वगळता इतर प्रवर्गातील विद्यार्थ्यांनी सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेले जात वैधता पडताळणी प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक असेल."

**याऐवजी**

"आर्थिक मागास घटकातील विद्यार्थ्यांना सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेले आर्थिक मागास प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक असेल", असे वाचावे.

३. सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०३११११५०९०८७६३४ असा आहे. सदर शासन शुद्धीपत्रक निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NARENDRA WAMAN AHER

Digitally signed by NARENDRA WAMAN AHER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD AND BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=93ab34830c74c1bdd18aba78607581bb0e2e31858d9e191999dca16966984dbb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6658A056228A0827243EBC94F7B8895CCED1C1604820C730DA4512E19C8AEF26, cn=NARENDRA WAMAN AHER
Date: 2024.03.11 15:19:23 +05'30'

**( नरेंद्र आहेर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१)मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, मुबई
६) मा. मंत्री (इ.मा.व.क.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परीक्षा) (लेखा व अनुज्ञेयता) १/२, मुंबई/ नागपूर
१०) जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे.
११) संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
१२) सर्व प्रादेशिक उप संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग,
१३) सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय विभाग.
१४) सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद.
१५) निवासी लेखा परिक्षक, मुंबई.
१६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१८) निवड नस्ती (योजना-५).